पोलीस दलातील रिक्त पदे भरण्यावरील
निर्बंध शिथिल करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय, क्रमांक : आरसीटी-३२००१/सीआर-५१०/पोल -५ अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ दिनांक : १४ जानेवारी, २००२

पहा :- १) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक :असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१.

**शासन निर्णय** शासनाने वित्त विभाग परिपत्रक, क्रमांक :बिजीटी- १०००/प्र.क्र.१३/२०००/ अर्थसंकल्प-१९,दिनांक १.३.२००० अन्वये सेवानिवृत्ती, स्वेच्छासेवा निवृत्ती, राजीनामा, मृत्यू या कारणांमुळे रिक्त होणारी पदे शासन मान्यतेशिवाय भरु नयेत अशी बंधने घातली होती. त्यानंतर शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक :असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१ अन्वये कोणत्याही कारणास्तव रिक्त होणारे पद उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेतल्याशिवाय भरु नये. व संबंधित विभागांनी त्यांच्या आस्थापनवरील सर्व पदांचा आढावा घेवून चालू आर्थिक वर्षासाठी उपलब्ध झालेल्या वेतनातील तरतुदीतून १.५% बचत (महागाई भत्त्यातील वाढ वगळून ) केल्याशिवाय रिक्त पदे भरण्यास परवानगी मिळणार नाही अशी बंधने घातली आहेत.

२. राज्यातील कायदा व सुव्यवस्था त्याचप्रमाणे अंतर्गत सुरक्षा व्यवस्था समर्थपणे हाताळण्याची जबाबदारी पोलीस विभागाकडे सुपूर्द करण्यात आलेली आहे. याकरिता पोलीस विभागाला आवश्यक मनुष्यबळ, साधनसामग्री व पोलीस दलातील अधिकारी कर्मचाऱ्यांना आवश्यक त्या सोयी सवलती उपलब्ध करुन देणे अगत्याचे आहे. राज्याची वाढती लोकसंख्या, वाढते नागरीकीकरण, बेरोजगारांचा प्रश्न, जागतिकीकरणामुळे वाढलेले गुतांगुतीचे प्रश्न, आर्थिक मंदी, देशाच्या सीमेलगत उद्‌भवलेला प्रश्न, अशा अनेक कारणांमुळे राज्याच्या अंतर्गत सुरक्षेला निर्माण झालेला धोका, तंत्रज्ञानाच्या विकासामुळे गुन्हयांचे बदलणारे स्वरुप, इत्यादी अनेक कारणांमुळे कायदा व सुव्यवस्था हातळण्याचा प्रश्न दिवसेंदिवस अधिक जटिल होत चाललेला आहे. देशाची सुरक्षितता, आंतरराष्ट्रीय दहशतवाद, राज्यामध्ये गेल्या काही महिन्यापासून गंभीरस्वरुप धारण करीत आहे, हे सर्व प्रश्न समर्थपणे हाताळण्यासाठी पोलीस विभागाचे सामर्थ्य वाढविणे अत्यंत आवश्यक आहे. पोलीस दलाला आवश्यक त्या सोयी सुविधा न पुरविल्यास त्यांच्या मनोबलावर त्याचा विपरीत परिणाम होतो त्यामुळे भावीकाळाचे आव्हान समर्थपणे पेलण्यासाठी पोलीस दलास आवश्यक त्या सोयी सुविधा तातडीने उपलब्ध करुन देण्याची गरज विचारात घेऊन शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे :-

(१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : असंक -१००१/प्र.क्र.२९/ २००१/ वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१ अन्वये रिक्त पदे भरण्यावर घातलेले निर्बंध पोलीस दलातील सध्या रिक्त असलेली खालील पदे भरण्यासाठी शिथिल करण्यात येऊन सदर पदे भरण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

GR-200201221354100 0200

<u>**सध्या रिक्त असलेली पदे**</u>

| | | |
|---|---|---|
| पोलीस शिपाई | - | २,५७४ |
| पोलीस नाईक | - | ४५० |
| पोलीस हवालदार | - | १,९५९ |
| सहायक पोलीस उपनिरीक्षक | - | ७९९ |
| पोलीस उपनिरीक्षक | - | ४८७ |
| सहायक पोलीस निरीक्षक | - | २६० |
| पोलीस निरीक्षक | - | ४१४ |
| पोलीस उपअधिक्षक | - | १०९ |
| पोलीस अधिक्षक | - | २४ |
| पोलीस उपमहानिरीक्षक | - | २ |
| अपर पोलीस महासंचालक | - | १ |
| **एकूण** | **-** | **७,०३९** |

(२) त्याचप्रमाणे, भविष्यात पोलीस दलातील रिक्त होणारी कार्यकारी पदे भरण्यासाठीही वर नमूद शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १०.९.२००१ मधील तरतूदी शिथिल करण्यात येत असून. सदर पदे भरण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

तथापि, वरील अ.क्र. (१) व (२) अन्वये देण्यात आलेली मंजूरी फक्त पोलीस दलातील कार्यकारी पदांपुरतीच मर्यादित असून सर्व प्रकारची प्रशासकीय ( लिपिक व इतर प्रशासकीय वर्गीय ) पदे भरण्यासाठी मात्र शासन निर्णय, वित्त विभाग, दिनाक १०.९.२००१ नुसार घातलेले निर्बंध कायम राहतील व त्यासाठी विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन आवश्यकतेनुसार मान्यता घेण्यात यावी.

(३) पोलीस दलातील कार्यकारी स्वरुपाची रिक्त पदे भरण्यासाठी वरील प्रमाणे मंजूरी देण्यात आली असली तरी शासन निर्णय वित्त विभाग, दिनांक १०.९.२००१ नुसार विहित केल्याप्रमाणे पोलीस दलातील सर्व पदांचा (कार्यकारी तसेच लिपिक व इतर प्रशासकीय वर्गीय ) सर्वकष आढावा घेणे आवश्यक असून, आढावा घेण्याचे चालू असलेले काम त्वरित पूर्ण करुन त्याबाबतचा अहवाल शासनास लवकरात लवकर सादर करण्यात यावा. तसेच, भरण्यात येणाऱ्या रिक्त पदांपैकी पोलीस शिपाई ते सहायक पोलीस उपनिरीक्षक दर्जाच्या पदांपर्यंतचा घटकनिहाय अहवाल तसेच पोलीस उपनिरीक्षक ते पोलीस महासंचालक दर्जाच्या पदांपर्यंतचा राज्यनिहाय अहवाल दर तीन महिन्यानी शासनास सादर करण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-५/ २००२/ व्यय- ७ , दिनांक ३.१.२००२ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शि. शं. धुमाळे )

उपसचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

GR-200201221354100000200